**औद्योगिक सुरक्षा, आरोग्य व कल्याणकारी या क्षेत्रात उत्तम कामगिरी करणाऱ्या कारखान्यांना "कै.नारायण मेघाजी लोखंडे औद्योगिक सुरक्षा व आरोग्य" नावे देण्यात यावयाचा पुरस्कार-निकष-निवड व कार्यपद्धती --**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र.एफएसी २०१८/प्र.क्र.५५२/काम.४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : २४ जानेवारी, २०१९.**

**प्रस्तावना :-**

औद्योगिक कामगारांना उत्तम स्वास्थ्य, सुरक्षितता व कल्याणकारी योजनांचा लाभ मिळावा यासाठी महाराष्ट्र शासन सतत प्रयत्नशील आहे. यामध्ये कारखाना व्यवस्थापनाचाही सहभाग मोलाचा आहे. ही बाब लक्षात घेऊन कारखाना व्यवस्थपनानेही स्वयंस्फूर्तीने सुरक्षा कार्य संस्कृतीचे पालन करणे आवश्यक आहे. यासाठी कारखाना व्यवस्थापनास प्रोत्साहन मिळावे म्हणून काही उपाययोजना करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. याचा एक भाग म्हणून औद्योगिक सुरक्षा, आरोग्य व कल्याणकारी योजना या क्षेत्रात उत्तम कामगिरी करणाऱ्या कारखान्यांचा पुरस्कार देऊन गौरव करण्यानुषंगाने पुरस्काराची कार्यपद्धती व रुपरेषा व तद्नुषंगिक सर्व बाबी निश्चित करुन याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

दिनांक ४ मार्च हा दिवस राष्ट्रीय सुरक्षा दिन म्हणून साजरा करण्यात येतो. त्याचे औचित्य साधून औद्योगिक सुरक्षा, आरोग्य व कल्याणकारी योजना या क्षेत्रात उत्तम कामगिरी करणाऱ्या कारखान्यांना "कै.नारायण मेघाजी लोखंडे औद्योगिक सुरक्षा व आरोग्य" या नावाने पुरस्कार देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. सदर पुरस्काराकरिता निवड करण्याकरिता ठरविण्यात आलेले निकष, पुरस्कारांची कार्यपद्धती, पुरस्कार्थींची निवड करण्यासाठी निवड समिती, जाहिरात प्रक्रिया या शासन निर्णयात अंतर्भूत करण्यात आले असून ते खालीलप्रमाणे आहेत:-

**पुरस्कार स्पर्धेत भाग घेण्यासाठीच्या अटी व शर्ती**

१) महाराष्ट्रातील कारखाने अधिनियमाखालील नोंदणीकृत कारखाने या स्पर्धेत भाग घेऊ शकतात.
२) कारखान्यातील उत्पादन प्रक्रिया पुरस्काराच्या वर्षापूर्वी कमीत कमी १ कॅलेंडर वर्षापूर्वी चालू झालेली असणे आवश्यक आहे, तसेच कारखान्यास कायमस्वरुपी परवाना प्राप्त झालेला असावा.
३) भाग घेणाऱ्या कारखान्यांनी विहित नमुन्यातील अर्ज निश्चित केलेल्या कालावधीत सादर करणे आवश्यक आहे.

४) अर्जासोबत खालीलप्रमाणे प्रवेश शुल्क भरणे आवश्यक राहील.
(अ) २५० पर्यंत कामगार संख्या असणारे कारखाने -- रुपये १५००/-
(ब) २५१ ते १००० पर्यंत कामगार संख्या असणारे कारखाने-- रुपये ३०००/-
(क) १००० पेक्षा जास्त कामगार संख्या असणारे कारखाने -- रुपये ४५००/-

सदर शुल्क ०२३०, कामगार व सेवायोजन, ८००, इतर जमा रकमा, (०१) इतर जमा रकमा, (०१)(०१) इतर जमा रकमा (०२३००१०७) या जमेच्या लेखाशीर्षाखाली जमा करण्यात यावे

५) कारखान्याचे "धोकादायक" व "धोकादायक नसणारे" कारखाने असे दोन गट करण्यात येतील. प्रत्येक गटामध्ये २५० पर्यंत कामगार असणारे कारखाने, २५१ व १००० पर्यंत कामगार असणारे कारखाने व १००० पेक्षा जास्त कामगार असणारे कारखाने असे तीन प्रवर्ग करण्यात येतील. अशा प्रकारे एकूण बक्षिसांची संख्या १८ असेल.

६) स्पर्धेसाठी अर्ज करण्याचा कालावधी प्रत्येक वर्षी १ जानेवारी ते ३१ जानेवारी असा राहील. माहे फेब्रुवारी अखेर संबंधित राज्यस्तरीय निवड समितीने गठीत केलेल्या विभागीय मूल्यमापन समित्या, अर्जांचे मूल्यांकन करुन राज्यस्तरीय निवड समितीला गुण कळवतील. त्यानुसार अंतिम विजेते राज्यस्तरीय समितीद्वारे निवडण्यात येतील व सुरक्षा सप्ताहामध्ये पुरस्कार वितरीत करण्यात येतील.

<u>पुरस्काराचे नांव व स्वरुप</u>

१. प्रत्येक प्रवर्गातील पुरस्कार खालीलप्रमाणे असतील.

**गट १ - धोकादायक कारखाने**

| प्रवर्ग | पुरस्काराचे नांव व स्वरुप | | |
|---|---|---|---|
| प्रवर्ग १<br>२५० पर्यंत कामगार असलेले कारखाने | कै.नारायण मेघाजी लोखंडे औद्योगिक सुरक्षा व आरोग्य - प्रथम पुरस्कार<br>गट १ - प्रवर्ग १<br>सुवर्ण पदक व प्रमाणपत्र | कै.नारायण मेघाजी लोखंडे औद्योगिक सुरक्षा व आरोग्य - द्वितीय पुरस्कार<br>गट १ - प्रवर्ग १<br>रजत पदक व प्रमाणपत्र | कै.नारायण मेघाजी लोखंडे औद्योगिक सुरक्षा व आरोग्य - तृतीय पुरस्कार<br>गट १ - प्रवर्ग १<br>कास्य पदक व प्रमाणपत्र |
| प्रवर्ग २<br>२५१ ते १००० पर्यंत कामगार असलेले कारखाने | कै.नारायण मेघाजी लोखंडे औद्योगिक सुरक्षा व आरोग्य - प्रथम पुरस्कार<br>गट १ - प्रवर्ग २<br>सुवर्ण पदक व प्रमाणपत्र | कै.नारायण मेघाजी लोखंडे औद्योगिक सुरक्षा व आरोग्य - द्वितीय पुरस्कार<br>गट १ - प्रवर्ग २<br>रजत पदक व प्रमाणपत्र | कै.नारायण मेघाजी लोखंडे औद्योगिक सुरक्षा व आरोग्य - प्रथम पुरस्कार<br>गट १ - प्रवर्ग २<br>कास्य पदक व प्रमाणपत्र |
| प्रवर्ग ३<br>१००१ किंवा त्यापेक्षा जास्त कामगार असलेले कारखाने | कै.नारायण मेघाजी लोखंडे औद्योगिक सुरक्षा व आरोग्य - प्रथम पुरस्कार<br>गट १ - प्रवर्ग ३<br>सुवर्ण पदक व प्रमाणपत्र | कै.नारायण मेघाजी लोखंडे औद्योगिक सुरक्षा व आरोग्य - द्वितीय पुरस्कार<br>गट १ - प्रवर्ग ३<br>रजत पदक व प्रमाणपत्र | कै.नारायण मेघाजी लोखंडे औद्योगिक सुरक्षा व आरोग्य - तृतीय पुरस्कार<br>गट १ - प्रवर्ग ३<br>कास्य पदक व प्रमाणपत्र |

## गट २ - धोकादायक नसलेले कारखाने

| प्रवर्ग | पुरस्काराचे नांव व स्वरुप | | |
|---|---|---|---|
| प्रवर्ग १<br>२५० पर्यंत कामगार असलेले कारखाने | कै.नारायण मेघाजी लोखंडे औद्योगिक सुरक्षा व आरोग्य - प्रथम पुरस्कार<br>गट २ - प्रवर्ग १<br>सुवर्ण पदक व प्रमाणपत्र | कै.नारायण मेघाजी लोखंडे औद्योगिक सुरक्षा व आरोग्य - द्वितीय पुरस्कार<br>गट २ - प्रवर्ग १<br>रजत पदक व प्रमाणपत्र | कै.नारायण मेघाजी लोखंडे औद्योगिक सुरक्षा व आरोग्य - तृतीय पुरस्कार<br>गट २ - प्रवर्ग १<br>कास्य पदक व प्रमाणपत्र |
| प्रवर्ग २<br>२५१ ते १००० पर्यंत कामगार असलेले कारखाने | कै.नारायण मेघाजी लोखंडे औद्योगिक सुरक्षा व आरोग्य - प्रथम पुरस्कार<br>गट २ - प्रवर्ग २<br>सुवर्ण पदक व प्रमाणपत्र | कै.नारायण मेघाजी लोखंडे औद्योगिक सुरक्षा व आरोग्य - द्वितीय पुरस्कार<br>गट २ - प्रवर्ग २<br>रजत पदक व प्रमाणपत्र | कै.नारायण मेघाजी लोखंडे औद्योगिक सुरक्षा व आरोग्य - तृतीय पुरस्कार<br>गट २ - प्रवर्ग २<br>कास्य पदक व प्रमाणपत्र |
| प्रवर्ग ३<br>१००१ किंवा त्यापेक्षा जास्त कामगार असलेले कारखाने | कै.नारायण मेघाजी लोखंडे औद्योगिक सुरक्षा व आरोग्य - प्रथम पुरस्कार<br>गट २ - प्रवर्ग ३<br>सुवर्ण पदक व प्रमाणपत्र | कै.नारायण मेघाजी लोखंडे औद्योगिक सुरक्षा व आरोग्य - द्वितीय पुरस्कार<br>गट २ - प्रवर्ग ३<br>रजत पदक व प्रमाणपत्र | कै.नारायण मेघाजी लोखंडे औद्योगिक सुरक्षा व आरोग्य - तृतीय पुरस्कार<br>गट २ - प्रवर्ग ३<br>कास्य पदक व प्रमाणपत्र |

२. पुरस्कारासाठी कारखान्यांची निवड करण्यासाठी गठीत समिती व तिची कार्यकक्षा

१) औद्योगिक सुरक्षा, आरोग्य व कल्याणकारी योजना या क्षेत्रात उत्तम कामगिरी करणाऱ्या कारखान्यांची निवड करण्यासाठी खालीलप्रमाणे राज्यस्तरावर निवड समिती गठीत करण्यात येत आहे :-

अध्यक्ष - प्रधान सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
सदस्य - संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई
सदस्य - संचालक, राष्ट्रीय सुरक्षा परिषद, मुंबई
सदस्य - संचालक (सुरक्षा), कारखाना सलाह सेवा एवं श्रम संस्थान महानिदेशालय, व्यवसायी सुरक्षा और स्वास्थ्य भवन, सायन, मुंबई
सदस्य सचिव - अपर संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई

२) राज्यस्तरीय निवड समिती प्रत्येक महसूली विभागाकरिता मूल्यमापन समिती गठीत करेल.

३) संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय यांचेकडे अर्ज स्विकारण्यात येऊन, कारखान्यांकडून प्राप्त झालेले अर्ज कारखाना ज्या विभागात आहे, त्या विभागाच्या मूल्यमापन समितीकडे पाठविण्याची कार्यवाही संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय यांचेकडून करण्यात येईल.

४) अर्जांची प्राथमिक छाननी व मूल्यमापनासाठी विभागीय स्तरावरील सह/उप संचालक यांचे अध्यक्षतेखालील मार्गाचे सदस्य व इतर औद्योगिक सुरक्षा व आरोग्य कार्यालयाचे सदस्य यांची मूल्यमापन समिती संबंधित कारखान्यांना भेटी देऊन त्यांचे

मूल्यमापन करतील व त्यांचे अहवाल माहे फेब्रुवारी अखेरपर्यंत राज्यस्तरीय निवड समितीकडे निर्णयार्थ पाठवेल.

५) राज्यस्तरीय निवड समिती प्रत्येक प्रवर्गातील गुणानुक्रमाने पाच कारखान्यांची निवड करील. या पाच कारखान्यांना राज्यस्तरीय निवड समितीपुढे संबंधित कारखान्यातील सुरक्षा, आरोग्य व कल्याणकारी योजना याबाबत केलेल्या उल्लेखनीय कामासंबंधी सादरीकरण करावे लागेल.

६) राज्यस्तरीय निवड समिती कारखान्यास १० पैकी गुण देईल. तसेच मूल्यांकन समितीने दिलेल्या गुणांची छाननी राज्यस्तरीय निवड समिती करेल.

अशा प्रकारे मूल्यांकन समितीने दिलेले गुण व राज्यस्तरीय निवड समितीचे गुण असे मिळून राज्यस्तरीय निवड समिती अंतिम गुण निश्चित करुन प्रत्येक प्रवर्गात बक्षिसपात्र ३ कारखान्यांची नांवे निश्चित करेल व आवश्यक वाटल्यास प्रत्येक प्रवर्गात एक उत्तेजनार्थ बक्षिस म्हणून प्रमाणपत्र देण्याचा निर्णय घेईल.

७) राज्यस्तरीय निवड समिती सुरक्षा सप्ताहामध्ये पुरस्कार विजेत्या कारखान्यांची नावे प्रसिद्ध करुन त्याप्रमाणे संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई हे बक्षिस वितरण सोहळा आयोजित करतील.

३. कारखान्यास पुरस्कार स्पर्धेत भाग घेण्याचा प्रवेश अर्ज प्रपत्र “अ” प्रमाणे असेल. तसेच मूल्यमापन समितीसाठी मार्गदर्शक सूचना प्रपत्र “ब” प्रमाणे असतील.

४. औद्योगिक सुरक्षा, आरोग्य व कल्याणकारी योजना या क्षेत्रात उत्तम कामगिरी करणाऱ्या कारखान्यांच्या पुरस्काराकरिता तसेच आयोजित करावयाच्या बक्षिस समारंभ इ. प्रयोजनार्थ होणारा खर्च संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय यांनी त्यांच्या कार्यालयीन खर्चामधून भागवावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९०१२४१६०७३१३३१० असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dr.Shrikant L. Pulkundwar

Digitally signed by Dr.Shrikant L. Pulkundwar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=feb24b5f5d1512bb47f7bae5ad1db4953358cd43c999bdf0814c6bb78364d50a, serialNumber=c10a1e6c8fbe08c1180978bd3ed8a151ed05202d522b09b9960341c2f080906d, cn=Dr.Shrikant L. Pulkundwar
Date: 2019.01.24 16:17:27 +05'30'

**( डॉ.श्री.ल.पुलकुंडवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५) मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,

६) मा.प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
७) उप सचिव (कामगार.४) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
८) संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई,
९) संचालक, राष्ट्रीय सुरक्षा परिषद, मुंबई,
१०) संचालक (सुरक्षा), कारखाना सलाह सेवा एवं श्रम संस्थापन महानिदेशालय, व्यवसायी सुरक्षा और स्वास्थ्य भवन, सायन, मुंबई,
११) अपर संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई,
१२) महालेखापाल (लेखा परीक्षा व लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर,
१३) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचानालय, मंत्रालय, मुंबई,
यांना विनंती आहे की, प्रस्तुत शासन निर्णयाला व्यापक प्रसिद्धी तात्काळ द्यावी.
१४) निवड नस्ती (कामगार ४)

**सन निर्णय क्र.एफएसी २०१८/प्र.क्र.५५२/काम.४, दिनांक २४ जानेवारी, २०१९ सोबतचे**

**<u>प्रपत्र- ' अ '</u>**

**ENTRY FORM FOR LATE NARAYAN MEGHAJI LOKHANDE INDUSTRIAL SAFETY AND HEALTH AWARD – 2019**

| | | | | |
|---|---|---|---|---|
| (1) | Name & address of Factory and Contract Person Name, Mobile No.& Mail ID | | | |
| (2) | Permanent License No.& Renewed upto Year | | | |
| (3) | Type of Factory (Give description to enable classification of Factory) | Hazardous/Other | | |
| (4) | Holding License for No.of Workers | 2016 | 2017 | 2018 |
| (5) | Total No.of man hours worked including Contract & other types workers | 2016 | 2017 | 2018 |
| | **Safety** | | | |
| (6) | No.of Reportable Accidents | 2016 | 2017 | 2018 |
| | a) Fatal | | | |
| | b) Serious | | | |
| | c) Other | | | |
| (7) | Largest accident free period during previous 3 years | From ----------- to ------------ | | |
| (8) | Computation | | | |
| | Year | (c)Weighted frequency rate for fatal accident | (d) frequency rate for serious accident | (e) frequency rate for other accident |
| | | (c1) | (d1) | (e1) |
| | | (c2) | (d2) | (e2) |
| | | (c3) | (d3) | (e3) |
| | Average frequency rate | <u>(c1+c2+c3)</u><br>3 | <u>(d1+d2+d3)</u><br>3 | <u>(e1+e2+e3)</u><br>3 |
| (9) | No. of dangerous occurrence | 2016 | 2017 | 2018 |
| | | (a) | (b) | (c) |
| (10) | Frequency rate of dangerous occurrence | | | |
| (11) | Average frequency rate of dangerous occurrence<br><u>(a+b+c)</u><br>3 | | | |
| (12) | Date of Safety Audit | | | |
| (13) | Date of Plant Testing | | | |
| (14) | If applicable Name of Safety Officer | | | |
| | **Health** | | | |
| (15) | Date of Medical Examination by Certifying Surgeon | 2016 | 2017 | 2018 |
| (16) | If applicable Name of Medical Officer appointed | | | |
| (17) | Occupational diseases reported | (a) | (b) | (c) |
| (18) | Average frequency rate of occupational disease<br><u>(a+b+c)</u><br>3 | | | |
| | **Welfare** | | | |
| (19) | If applicable Name of Qualified Welfare Officer | 2016 | 2017 | 2018 |
| (20) | If applicable whether canteen/lunch room provided | | | |
| (21) | If applicable whether crèche facility provided | | | |

**Note 1 – for computation :**

| | | |
|---|---|---|
| (c) weighted frequency rate for fatal accident | = | **(8)(c)** x 1000000x10 / (5), |
| Frequency rate for serious accident | = | **(8)(d)** x 1000000 / (5), |
| Frequency rate for other accident | = | **(8)(c)** x 1000000 / (5), |
| Frequency rate for dangerous occurrence | = | **(11)(e)** x 1000000 / (5), |
| Frequency rate of occupational disease | = | **(18)(a)** x 1000000 / (5), |

**(8)(c), (8)(d), (8)(e), (11)(a), (18)(a), (5)** means values at concerned serial numbers as above

Note 2 : If there is any dispute about type of factory, classification from record of DISH will be considered final.

Note 3 : Entryfee of Rs. _____________ is paid online as per information broucher.

**Signature of**
**Occupier/Manager**
**of Factory with seal**

**शासन निर्णय क्र.एफएसी २०१८/प्र.क्र.५५२/काम.४, दिनांक २४ जानेवारी, २०१९ सोबतचे**

## प्रपत्र – ' ब '

**मूल्यमापन समितीस मार्गदर्शक सूचना**

राज्यस्तरीय निवड समिती प्रत्येक विभागात एक मूल्यमापन समिती गठीत करेल. अशी समिती स्पर्धेत भाग घेतलेल्या कारखान्यास पूर्वसूचना देऊन भेट देईल व अर्जात भरलेल्या माहितीची खातरजमा करेल व १०० पैकी खालीलप्रमाणे गुण देऊन निवड समितीस अहवाल सादर करेल.

**(१) सेफ्टी विभाग – कमाल गुण ७७**

(अ) अनु.क्र.(७) साठी १८ कमाल गुण – एक महिना सलग अपघातरहीत कालावधीसाठी ०.५ गुण याप्रमाणे गुण द्यावेत.

(ब) अनु.क्र.(८)(क) साठी कमाल १४ गुण किमान फ्रिक्वेन्सी रेटसाठी (L) द्यावेत इतर कारखान्याचे गुण

$$(x) = \frac{L \times १४}{AFR}$$

(क) अनु.क्र.(८)(ड) साठी किमान फ्रिक्वेन्सी रेटसाठी (L) १३ गुण असतील.
इतर कारखान्याचे गुण $(x) = \frac{L \times १३}{AFR}$

(ड) अनु.क्र.(८)(इ) साठी किमान फ्रिक्वेन्सी रेटसाठी (L) १३ गुण असतील.
इतर कारखान्याचे गुण $(x) = \frac{L \times १३}{AFR}$

(प) अनु.क्र.(११) साठी किमान फ्रिक्वेन्सी रेट (L) साठी कमाल १० गुण असतील.
इतर कारखान्याचे गुण $(x) = \frac{L \times १०}{AFR}$

(फ) अनु.क्र.(१२) – मागील तीन वर्षांत एक वेळ शासन मान्यताप्राप्त सुरक्षा लेखा परीक्षकाकडून सुरक्षा लेखा परीक्षण केले असल्यास ३ गुण अन्यथा ० गुण

(इ) अनु.क्र.(१३) – कमाल ३ गुण – एक कॅलेंडर वर्षी प्लॉंट टेस्टींग केले असल्यास १ गुण याप्रमाणे मूल्यांकन करावे.

(ई) अनु.क्र.(१४) – कमाल ३ गुण – एक पूर्ण कॅलेंडर वर्षात सुरक्षा अधिकारी कार्यरत असल्यास १ गुण याप्रमाणे मूल्यांकन करावे.

**(२) आरोग्य विभाग कमाल गुण – १४**

(अ) अनु.क्र.(१५) साठी कमाल ३ गुण – एक वर्ष सर्टीफाईंग सर्जनकडून वैद्यकीय तपासणी झाली असल्यास १ गुण याप्रमाणे गुण द्यावेत.

(ब) अनु.क्र.(१६) – कमाल ३ गुण – सलग एक कॅलेंडर वर्ष पात्र वैद्यकीय अधिकाऱ्याची नेमणूक व कार्यत असल्यास १ गुण याप्रमाणे गुण द्यावेत.

(क) अनु.क्र.(१८) - कमाल ८ गुण - सर्वात कमी फ्रिक्वेन्सी रेट (L) असल्यास तर

इतर कारखान्याचे गुण = $\frac{L \times ८}{AFR}$

(३) **<u>कल्याणकारी योजना - कमाल ९ गुण</u>**

(१) अनु.क्र.(१९) - कमाल ३ गुण - एक कॅलेंडर वर्ष पात्र वेल्फेअर अधिकारी कार्यरत असल्यास १ गुण याप्रमाणे गुण द्यावेत.

(२) अनु.क्र.(२०) - कमाल ३ गुण - एक कॅलेंडर वर्षात महाराष्ट्र कारखाने नियम १९६३ प्रमाणे कॅन्टीन किंवा रेस्ट रुम सुविधा असल्यास १ गुण याप्रमाणे गुण द्यावेत.

(३) अनु.क्र.(२१) - कमाल ३ गुण - एक कॅलेंडर वर्षात महाराष्ट्र कारखाने नियम १९६३ प्रमाणे क्रेच सुविधा असल्यास १ गुण याप्रमाणे गुण द्यावेत.